**श्री.आकेश शंकर जोशी, प्रभाग क्र. ०१, सदस्य नगरपंचायत खालापूर (जि.रायगड) यांनी निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून १२ महिन्याच्या मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याने त्यांची निवड भूतलक्षी प्रभावाने रद्दबातल करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक - जावैप्र-२०२३/प्र.क्र.५८/नवि-१९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २२ जून, २०२३

**संदर्भ** :- १) जिल्हाधिकारी, रायगड यांचे पत्र क्र. नपाप्र/कार्या-४/न.पं.सा.नि/जा.वै.प्र./२०२३/५५, दि.१०.०३.२०२३

२) शासन परिपत्रक नगर विकास विभाग क्र. एमसीओ-२०१६/प्र.क्र.४६/नवि-१४, दि.२८.०३.२०१६

३) शासन परिपत्रक, नगर विकास विभाग क्र.एमसीओ-२०१६/प्र.क्र.३१३/नवि-१४, दि.१०.०१.२०१७

४) सन २०१८ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ६५ (मुंबई महानगरपालिका, महाराष्ट्र महानगरपालिका आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम,१९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करण्याकरीता अधिनियम )

**प्रस्तावना :-**

नगरपंचायत खालापूर (जि. रायगड) येथील प्रभाग ०१- अनुसूचित जाती यामधून श्री.आकेश शंकर जोशी हे दि.१९.०१.२०२२ रोजी नगरपंचायत सार्वत्रिक निवडणूकीमध्ये सदस्य म्हणून निवडून आले.

२. सन २०१८ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ६५ (मुंबई महानगरपालिका, महाराष्ट्र महानगरपालिका आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम,१९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करण्याकरीता अधिनियम) उक्त अधिनियमात महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ च्या कलम ९ अ मध्ये सुधारणा करण्यात आली असून, याद्वारे मागासवर्गीयांसाठी राखीव असलेल्या प्रभागातून निवडून आलेल्या सदस्यास जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्याबाबत असलेली मुदत "सहा महिन्यां" वरुन "बारा महिने" इतकी वाढविण्यात आलेली आहे. तसेच सदर तरतूदी पूर्वलक्षी प्रभावाने दिनांक ०७/०४/२०१५ पासून लागू करण्यात आल्या आहेत.

३. वरील तरतुदींनुसार श्री.जोशी यांनी १२ महिन्याच्या कालवधीत म्हणजेच दि.१९.०१.२०२३ पर्यंत जात वैधता प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक होते. तथापि, त्यांनी विहीत कालावधीत जात वैधता प्रमाणपत्र सादर केले नसल्याने ते पालिका सदस्य म्हणून अनर्ह ठरत आहेत. सबब, त्यांची सदस्यपदी झालेली निवड भूतलक्षी प्रभावाने रद्दबातल झाली असल्याचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**<u>शासन आदेश</u>:-**

श्री.आकेश शंकर जोशी, (प्रभाग क्र. ०१, अनुसूचित जाती ) सदस्य नगरपंचायत खालापूर (जि. रायगड), यांनी महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ च्या कलम ९ अ तसेच सन २०१८ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ६५ (मुंबई महानगरपालिका, महाराष्ट्र महानगरपालिका आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम,१९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करण्याकरीता अधिनियम ) मधील सुधारणा कलम ९ अ नुसार निवडून आल्याच्या दिनांकापासून १२ महिन्याच्या मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर केले नसल्याने त्यांची सदस्यपदी झालेली निवड भूतलक्षी प्रभावाने रद्दबातल ठरविण्यात येत असून, ते पालिका सदस्य म्हणून राहण्यास निरर्ह ठरत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०६२२१८०२५६८७२५ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RASHMIKANT PUNDLIKRAO INGOLE

Digitally signed by RASHMIKANT PUNDLIKRAO INGOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=58f272615d694188999d7059c35044b641a6f79b7f11b072357a034f1945b5bf, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=790D7A8A18A9128F2444E4F50CEC8C48E1E5B4AC49A5B5B6D6596149B3010E5B, cn=RASHMIKANT PUNDLIKRAO INGOLE
Date: 2023.06.22 18:04:27 +05'30'

**( रश्मिकांत इंगोले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई
४) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय्य सहायक,मंत्रालय,मुंबई
५) मा.राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय,मुंबई.
६) प्रधान सचिव, (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
७) विभागीय आयुक्त, कोकण विभाग,नवी मुंबई.
८) जिल्हाधिकारी, रायगड.
९) उप सचिव,(नवि-१४), नगर विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
१०) मुख्याधिकारी, नगरपंचायत खालापूर, जि. रायगड
११) श्री. आकेश शंकर जोशी, नगरपंचायत खालापूर, जि. रायगड
१२) निवडनस्ती (नवि-१९).